सामान्य राज्य सेवा, गट-अ मधील मुख्य प्रशासकीय अधिकारी संवर्गातील पदस्थापनेतील अंशत: बदलाबाबत

**महाराष्ट्रशासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१५/प्र.क्र. १६४ /सेवा-२**
गो.ते रुग्णालय संकुल, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १८ एप्रिल, २०१५

## शासन निर्णय

श्री. जी. एम. बिऱ्हाडे, मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक, आरोग्य सेवा नाशिक मंडळ, नाशिक यांनी दिनांक ३०.८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये सामान्य रुग्णालय, परभणी येथे पदोन्नतीने देण्यात आलेल्या पदस्थापनेविरुध्द मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्रमांक ८१९/२०१४ दाखल केला. सदर मूळ अर्जामध्ये मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी दिनांक १८.२.२०१५ रोजी अंतिम आदेश पारित केले आहेत. सदर न्यायनिर्णयानुसार श्री. डी. डी. पानपाटील यांना पदोन्नतीने "कोकण" या महसूल विभागात दिनांक ३०.८.२०१४ अन्वये मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे येथे देण्यात आलेली पदस्थापना रदद करण्यात आली आहे. आता या आदेशान्वये श्री. डी. डी. पानपाटील, मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे यांची प्रशासकीय कारणास्तव मुख्य प्रशासकीय अधिकारी, प्रादेशिक मनोरुग्णालय, रत्नागिरी येथे पदस्थापना करण्यात येत आहे.

श्री. डी. डी. पानपाटील यांना त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक आरोग्य सेवा, मुंबई व शासनास सादर करावेत.

हा शासन निर्णय सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१६१५५३१६०२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2015.04.18 12:57:20 +05'30'

(वि. पुं. घोडके)
अवर सचिव ,महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक आरोग्य सेवा, मुंबई

२) सहसंचालक आरोग्य सेवा, (प्रशासन), मुंबई
३) उपसंचालक आरोग्य सेवा (सर्व)
४) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ मुंबई / महाराष्ट्र २ नागपूर
५) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ मुंबई / महाराष्ट्र २ नागपूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / रत्नागिरी
७) अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय,रत्नागिरी
८) श्री. डी. डी. पानपाटील, मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे
९) स्वीय सहायक प्रधान सचिव (सा.आ.) सा. आ. वि. मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती (सेवा -२)